**चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यांमध्ये “रिसोर्स बेस्ड इंटेसिव्ह प्लॅनिंग व डेव्हलपमेंट” हा पथदर्शी कार्यक्रम राबविण्यासाठी निर्माण केलेल्या २३ पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि.३०.०९.२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय, क्र. चांबायो - २०१८/प्र.क्र.६१/का.१४१८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १० जानेवारी, २०१९

वाचा : (१) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. डिएपी- १०१६/ प्र.क्र. ५१/ का. १४८१, दि.२९ जून,२०१६.
(२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. डिएपी-१०१६/ प्र.क्र. १८६/ का. १४८१, दि.१८ नोव्हेंबर, २०१६.
(३) नियोजन विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र चांबायो - २०१८/प्र.क्र.०३/का.१४१८, दि.१२ जानेवारी, २०१८.
(४) वित्त विभागाचे पत्र क्र.पदनि-२०१८/प्र.क्र.११८/१८/आपुक, दि.१जानेवारी, २०१९.

**प्रस्तावना:-**

राज्याच्या सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पिय भाषणामध्ये “महाराष्ट्राच्या दोन टोकावरील चंद्रपुर व सिंधुदुर्ग हे खनिज व नैसर्गिक संपत्तीचे वरदान लाभलेले जिल्हे आहेत. या जिल्हयांतील नैसर्गिक साधनसंपत्तीचा इष्टतम वापर व्हावा यासाठी सधन नियोजन व अंमलबजावणीचा विशेष कार्यक्रम राबविण्यात येईल” अशी घोषणा करण्यात आली होती. सदर घोषणेस अनुसरुन राज्य शासनाने चंद्रपूर व सिंधुदूर्ग या दोन जिल्ह्यांची निवड सूक्ष्म नियोजन व अंमलबजावणीसाठी केली आहे.

२. नियोजन विभागाचे संदर्भ क्र.(१) येथील दि.२९/६/२०१६ च्या शासन निर्णयान्वये चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यामध्ये “रिसोर्स बेस्ड इंटेसिव्ह प्लॅनिंग व डेव्हलपमेंट” हा पथदर्शी कार्यक्रम राबविण्यासाठी चांदा ते बांदा योजनेस शासनाची मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयास अनुसरून नियोजन विभागाचे संदर्भ क्र.(२) येथील दिनांक १८/११/२०१६ च्या शासन निर्णयानुसार राज्यस्तरावर नियोजन विभागाच्या अधिपत्याखाली "राज्यस्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष" आणि दोन्ही जिल्ह्यांकरीता "जिल्हास्तरावर जिल्हा प्रकल्प व्यवस्थापन कक्ष" स्थापन करण्यात आले असून राज्यस्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्षासाठी ९ पदे व जिल्हास्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष चंद्रपूरकरिता ७ पदे व सिंधुदूर्गकरिता ७ पदे अशी एकूण २३ पदे तात्पुरत्या स्वरूपात २ वर्षांच्या कालावधीसाठी निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात आली होती. सदर पदांची मुदत ३० सप्टेंबर,२०१८ रोजी संपली असल्याने सदर पदांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव अ.मु.स.(सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या उपसमितीच्या शिफारशीनुसार मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता.

**शासन निर्णय:-**

चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यांमध्ये "रिसोर्स बेस्ड इंटेसिव्ह प्लॅनिंग व डेव्हलपमेंट" हा पथदर्शी कार्यक्रम राबविण्यासाठी "राज्यस्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष" आणि चंद्रपूर व सिंधुदूर्ग या जिल्ह्यांसाठी "जिल्हास्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष" या करीता निर्माण केलेल्या एकूण २३ पदांना वित्त विभागाचे संदर्भ क्र.४ येथिल पत्रान्वये उच्चस्तरीय सचिव समितीने दि.१५.१२.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार पुढील तक्त्यामध्ये दर्शविलेली २३ पदे दि.१.१०.२०१८ ते दि.३०.०९.२०१९ या कालावधीसाठी पुढे चालु ठेवण्यास मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | पदभरतीचा मार्ग |
|---|---|---|---|
| **राज्यस्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष** | | | |
| १. | प्रकल्प संचालक | १ | प्रतिनियुक्ती |
| २. | प्रकल्प व्यवस्थापक (मूल्यमापन) | १ | प्रतिनियुक्ती |
| ३. | प्रकल्प व्यवस्थापक | २ | बाह्ययंत्रणेद्वारे |
| ४. | युवा व्यवसायिक | २ | बाह्ययंत्रणेद्वारे |
| ५. | कार्यालयीन सहायक | ३ | बाह्ययंत्रणेद्वारे |
| | **एकूण पदे** | ९ | |
| **जिल्हास्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, चंद्रपूर व सिंधुदुर्ग** | | | |
| १. | जिल्हा समन्वयक | २ | प्रतिनियुक्ती |
| २. | समन्वयक (मूल्यमापन) | २ | प्रतिनियुक्ती |
| ३. | समन्वयक | ४ | बाह्ययंत्रणेद्वारे |
| ४. | युवा व्यावसायिक | २ | बाह्ययंत्रणेद्वारे |
| ५. | कार्यालयीन सहाय्यक | ४ | बाह्ययंत्रणेद्वारे |
| | **एकूण पदे** | **१४** | |

२. वरील तक्त्यात दर्शविलेल्या एकूण २३ पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या तसेच, बाह्य यंत्रणेकडून भरण्यात येणाऱ्या पदांकरिता व्यक्तींची शैक्षणिक अर्हता संदर्भाधिन नियोजन विभागाचे संदर्भ क्र. (२) च्या शासन निर्णय व संदर्भ क्र. (३) च्या शासन शुध्दीपत्रक प्रमाणेच राहतील.

३. चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यामध्ये "रिसोर्स बेस्ड इंटेसिव्ह प्लॅनिंग व डेव्हलपमेंट" या पथदर्शी कार्यक्रमासाठी होणारा खर्च मागणी क्र.ओ- ७, लेखाशिर्ष "३४५१- सचिवालय आर्थिक सेवा, ००,०९०-सचिवालय, (०५) चांदा ते बांदा विशेष कार्यक्रम, (०५) (०१) चंद्रपूर व सिंधुदूर्ग या जिल्हयांमध्ये रिसोर्स बेस्ड इंटेसिव्ह प्लॅनिंग व डेव्हलपमेंट कार्यक्रम राबविणे (३४५१ ए ०१९)" याखालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदरचा शासन निर्णय www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक २०१९०११०१५०५४९१४१६ असा आहे. तसेच हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2019.01.11 15:07:18 +05'30'

**( वि.फ.वसावे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.मा. राज्यपाल यांचे सचिव ,
२.मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३.मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
४.सर्व मा. मंत्री आणि राज्यमंत्री,
५.मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, विधानभवन, मुंबई.
६.मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
७.मा. मुख्य सचिव,
८.सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
९.सर्व विभागीय आयुक्त
१०.जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सिंधुदूर्ग व चंद्रपूर
११.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रशासकीय इमारत, ८ वा मजला, वांद्रे (पुर्व), मुंबई-५१.
१२.मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग व चंद्रपूर
१३.उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, कोकण विभाग व नागपूर विभाग
१४.महालेखापाल, महाराष्ट्र १ व २ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), मुंबई व नागपूर.
१५.जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर व सिंधुदूर्ग.
१६.सर्व सहसचिव / उपसचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई. ३२.
१७.प्रकल्प संचालक, राज्यस्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८.निवड नस्ती, का. १४१८.